आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत जिल्हा वार्षिक आदिवासी उपयोजना सन २०२०-२१ करीता निधी वितरण. (डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम अमृत आहार योजना)

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/ प्र.क्र. ०१ / कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ३ ऑगस्ट, २०२०.

वाचा -

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४ /अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, बीयुडी/२०२०/प्र.क्र. १/कार्या.६, दि.२१.०४.२०२०.

**शासन निर्णय-**

जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत भारतरत्न डॉ. ए.पी.जे.अब्दुल कलाम अमृत आहार योजनेमधून आदिवासी गरोदर स्त्रिया, स्तनदा माता व बालकांना पुरक पोषण आहार पुरविण्यात येतो. आदिवासी भागातील कुपोषण निवारण करण्याबाबतची सदर योजना असल्याने व कोविड-१९ च्या प्रादुर्भावामुळे आरोग्य विषयक कामे प्राधान्याने करण्याची गरज लक्षात घेऊन संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रम सन २०२०-२१ अंतर्गत सदर योजनेसाठी ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या बाबीखाली अर्थसंकल्पिय तरतुदीच्या १० टक्के प्रमाणे निधी वितरीत करण्यात आला आहे.

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीय तरतुदीच्या २५ टक्क्यांच्या मर्यादेतील निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने सहमती दर्शविलेली आहे. यास अनुसरून जिल्हा वार्षिक आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र. टि-९ मधील सोबतच्या विवरण पत्रातील स्तंभ क्रमांक २ मध्ये नमूद जिल्ह्यांकरीता सदर योजनेसाठी अर्थसंकल्पित तरतूदीच्या १५ टक्के निधी स्तंभ ६ प्रमाणे संबंधित नियंत्रक अधिकारी तथा जिल्हाधिकारी यांना वितरीत व खर्च करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. लॉक डाऊनमुळे पुढील काही कालावधी राज्याची आर्थिक स्थिती गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा.

३. नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुदी त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित कराव्यात. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. आदिवासी क्षेत्रात वास्तव्यास असणाऱ्या गर्भवती स्त्रिया तसेच लहान मुले यांच्या गरजा लक्षात घेऊन त्यांच्या आरोग्याशी संबंधित विशेष व्यवस्था जिल्हा प्रशासनाकडून करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व दि.२९.०६.२०२० रोजीच्या अनौपचारिक मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०३११३५०६३३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.08.03 17:02:10 +05'30'

**(रविंद्र दि.औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
७. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
८. सर्व जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विकास समिती.
९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१०. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
११. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१२. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१३. सर्व उपसचिव / कक्ष अधिकारी (का-८), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
१५. महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१६. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१७. निवड नस्ती (का-६).

## शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२०/प्र.क्र.०१/का-६, दि. ३ ऑगस्ट,२०२० सोबतचे विवरणपत्र

(रू.हजारात)

| अ. क्र. | जिल्हा | बाब/उद्दिष्ट | डॉ.ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजनेकरीता अर्थसंकल्पित तरतूद | यापूर्वी दि.२१.०४. २०२० च्या आदेशान्वये वितरीत तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | (३१) (०३) जिल्हा ठाणे (२२२५ ई०७१) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १२१०००.०० | १००८३.३३ | २०१६६.६७ |
| २ | (३१) (०४) जिल्हा रायगड (२२२५ ई०८९) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ४११६१.०० | ३४३०.०८ | ६८६०.१७ |
| ३ | (३१) (०७) जिल्हा पुणे (२२२५ ई११३) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | २४०००.०० | २०००.०० | ४०००.०० |
| ४ | (३१) (१२) जिल्हा नाशिक (२२२५ ई१६९) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | २३००००.०० | १९१६६.६७ | ३८३३३.३३ |
| ५ | (३१) (१३) जिल्हा धुळे (२२२५ ई१७८) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १४५३५३.०० | १२११२.७५ | २४२२५.५० |
| ६ | (३१) (१४) जिल्हा जळगाव (२२२५ ई१८७) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ३००००.०० | २५००.०० | ५०००.०० |
| ७ | (३१) (१५) जिल्हा अहमदनगर (२२२५ ई१९६) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ४८०००.०० | ४०००.०० | ८०००.०० |
| ८ | (३१) (१६) जिल्हा नंदुरबार (२२२५ ई२०२) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ४५००००.०० | ३७५००.०० | ७५०००.०० |
| ९ | (३१) (२०) जिल्हा नांदेड (२२२५ ई२४९) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ६००००.०० | ५०००.०० | १००००.०० |
| १० | (३१) (२३) जिल्हा उस्मानाबाद (२२२५ ई२७६) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | २.०० | ०.१७ | ०.३३ |
| ११ | (३१) (२५) जिल्हा नागपूर (२२२५ ई२९४) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १८९५०.०० | १५७९.१७ | ३१५८.३३ |

| अ. क्र. | जिल्हा | बाब/उद्दिष्ट | डॉ.ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजनेकरीता अर्थसंकल्पित तरतूद | यापूर्वी दि.२१.०४. २०२० च्या आदेशान्वये वितरीत तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १२ | (३१) (२८) जिल्हा चंद्रपूर (२२२५ ई३२९) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १२७०००.०० | १०५८३.३३ | २११६६.६७ |
| १३ | (३१) (२९) जिल्हा गडचिरोली (२२२५ ई३३८) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | २२४१७९.०० | १८६८१.५८ | ३७३६३.१७ |
| १४ | (३१) (३०) जिल्हा गोंदिया (२२२५ ई३४७) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ४००००.०० | ३३३३.३३ | ६६६६.६७ |
| १५ | (३१) (३१) जिल्हा अमरावती (२२२५ ई३५६) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ११००००.०० | ९१६६.६७ | १८३३३.३३ |
| १६ | (३१) (३३) जिल्हा यवतमाळ (२२२५ ई३७४) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ५३०८८.०० | ४४२४.०० | ८८४८.०० |
| १७ | (३१) (३६) जिल्हा पालघर (२२२५ ई४०९) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ३२००००.०० | २६६६६.६७ | ५३३३३.३३ |
| | **एकुण** | | **२०४२७३३.००** | **१७०२२७.७५** | **३४०४५५.५०** |